**कोयना भूकंप पुनर्वसन निधी समिती अंतर्गत संगमेश्वर तालुक्यातील विकास कामांना प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्ध करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन)**
शासन निर्णय क्रमांक-कोभूपु-३१२४/प्र.क्र. ७९/र-५
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक:- २५ मार्च, २०२५

**वाचा:-**

१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:-कोभूपु-१५२३/प्र.क्र.०१/का. ५ (नासंस), दि. १३/०६/२०१८.
२. शासन निर्णय, महसूल व वन विभाग (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन), क्रमांक-कोभूपु-३१२३/ प्र. क्र. ११/र-५, दि. ०६/०२/२०२४.
३. शासन निर्णय, महसूल व वन विभाग (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन), क्रमांक-कोभूपु-३१२३/ प्र.क्र.११/र-५, दि.०७/०६/२०२४.
४. शासन शद्धीपत्रक, महसूल व वन विभाग (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन), क्रमांक-कोभूपु-३१२३/ प्र.क्र.११/र-५, दि. २६/११/२०२४
४. वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विअप २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. १७/०४/२०१५.
५. जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांचे पत्र क्र. १. ससाशा/कार्या-७/कावि ३६९/२०२४, दि. २१/१०/२०२४.
२. ससाशा/कार्या-७/कावि ३६१, ३९१, ३९२/२०२४, दि. २९/११/२०२४.
३. ससाशा/कार्या-७/कावि ४४४/२०२४, दि. २३/१२/२०२४.
४. ससाशा/कार्या-७/कावि ३२४/२०२४, दि. ३०/०९/२०२४.
५. ससाशा/कार्या-७/कावि ३२३/२०२४, दि. ०४/१०/२०२४.
६. ससाशा/कार्या-७/कावि ३७,५१/को.भू.पु./२०२५, दि. १५/०२/२०२५.
७. ससाशा/कार्या-७/कावि ५२,५९/को.भू.पु./२०२५, दि. १९/०२/२०२५.
८. ससाशा/कार्या-७/कावि ६०/को.भू.पु./२०२५, दि. १९/०२/२०२५
९. ससाशा/कार्या-७/कावि ३५७,३६५,३७०/२०२४, दि. २७/०१/२०२५.
१०. ससाशा/कार्या-७/कावि ५८/को.भू.पु./२०२५, दि. १९/०२/२०२५.
११. ससाशा/कार्या-७/कावि १६/को.भू.पु./२०२५, दि. २७/०१/२०२५.
१२. ससाशा/कार्या-७/कावि ३६३/२०२४, दि. २७/०१/२०२५.
१३. ससाशा/कार्या-७/कावि ८१/को.भू.पु./२०२५, दि. २८/०२/२०२५.
१४. ससाशा/कार्या-७/कावि ११०,१२१/को.भू.पु./२०२५, दि. ०७/०३/२०२५.
१५. ससाशा/कार्या-७/कावि ९१,११९/को.भू.पु./२०२५, दि. ०७/०३/२०२५.
१६. ससाशा/कार्या-७/कावि ८६/को.भू.पु./२०२५, दि. ०७/०३/२०२५.

**प्रस्तावना :-**

मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अध्यक्षतेखाली "कोयना भूकंप पुनर्वसन निधी समिती" कार्यरत असून सन २०२४-२५ करीता नवीन कामाच्या मंजूरीसाठी मंजूर निधी तालुकानिहाय टक्केवारी प्रमाणे वाटपाची मंजुरी देण्यात आलेली आहे. त्या अनुषंगाने निधी तालुकानिहाय टक्केवारी प्रमाणे वाटपाची मंजुरी देण्यात आलेली आहे. त्या अनुषंगाने तालुका संगमेश्वर करीता निधीच्या १५% निश्चित करण्यात आली आहे त्यानुसार संगमेश्वर तालुक्यातील विकास कामांकरीता प्रशासकीय मान्यता व निधी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"कोयना भूकंप पुनर्वसन निधी समिती" साठी महाराष्ट्र राज्याच्या अर्थसंकल्पातून तरतूद करुन व राज्य शासनाकडून समितीस मिळणारा निधी हा इतर कुठल्याही कामांवर खर्च न करता कोयना भूकंपप्रवण क्षेत्रामध्ये येणा-या ८ तालुक्यांच्या (पाटण, कराड (उत्तर), कराड (दक्षिण), जावळी, सातारा, महाबळेश्वर, संगमेश्वर व चिपळूण) दुर्गम भागात वसलेल्या खेडयांच्या विकासासाठी "कोयना भूकंप पुनर्वसन निधी समिती" यांच्या नियमाप्रमाणे केवळ कोयना भूकंप पुनर्वसन निधी समितीकरीताच खर्च करण्याच्या प्रयोजनाकरिता जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांनी पाठविलेल्या संगमेश्वर तालुक्यातील विकास कामांची संख्या एकूण ८४ असून कार्यकारी अभियंता,

बांधकाम विभाग रत्नागिरी, जिल्हा परिषद, रत्नागिरी तसेच कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांच्या कार्यालयाकडून एकूण ८४ कामांना तांत्रिक मान्यता देण्यात आली आहे. ८४ कामांची तांत्रिक मान्यतेची रक्कम रु. ८,९९,९८,५६३/- (रुपये आठ कोटी नव्व्यान्नव लाख अठ्ठ्यान्नव हजार पाचशे त्रेसष्ठ फक्त) इतकी आहे. त्यानुसार शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र.२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार मंजूर अनुदानातून संगमेश्वर तालुक्यातील सोबत जोडलेल्या परिशिष्ठ-अ विकास कामांना कोयना भूकंप पुनर्वसन निधी समितीच्या नियमानुसार मागणी क्र. सी-०५ मुख्यलेखाशीर्ष २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०१-पुनर्वसन, २०२-इतर पुनर्वसन योजना (०७)(०१) कोयना भूकंप पुनर्वसन निधी समिती (अनिवार्य) (दत्तमत) (२२३५ डी५५१) ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली प्रशासकीय मान्यता प्रदान करुन प्रथमत: ५०% रक्कम रु. ४,४९,९९,२८३/- (रुपये चार कोटी एकोणपन्नास लाख नव्व्यान्नव हजार दोनशे त्र्याएंशी फक्त) इतका निधी जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांना पुढील परिच्छेद क्र. ५ मध्ये नमूद अटी/शर्तींच्या अधीन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. संबधीत कार्यान्वित यंत्रणेच्या कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग रत्नागिरी, जिल्हा परिषद रत्नागिरी तसेच कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांनी सोबत जोडलेल्या परिशिष्ठ-अ च्या यादीनुसार सुरु करण्यात आलेल्या विकास कामांच्या प्रगतीच्या अहवाल/खर्चाच्या प्रगतीच्या अहवाल इ. सादर करुन कामाच्या प्रगतीनुसार सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाच्या कालावधीत सदर कामे पूर्ण करण्याच्या नियोजनानुसार खर्च मागणी क्र. सी-०५ मुख्यलेखाशीर्ष २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०१-पुनर्वसन, २०२-इतर पुनर्वसन योजना (०७)(०१) कोयना भूकंप पुनर्वसन निधी समिती (अनिवार्य) (दत्तमत) (२२३५ डी५५१) ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली आवश्यक मागणी शासनास सादर करावी. त्यानुषंगाने मंजूर व उपलब्ध तरतुदीतून आवश्यक तेवढा निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करण्यात येईल. सदरच्या विकास कामांसाठी वितरीत करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने प्रलंबित उपयोगिता प्रमाणपत्रे (Utilization Certificate) प्राधन्याने सादर करावीत.

३. समितीच्या अंतर्गत कामाच्या अंमलबजावणीसाठी समितीच्या कार्यकारिणीने दिनांक २९.०७.२०१३ रोजीच्या बैठकीत पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे. "शासकीय नियमांचे व पध्दतीचा अवलंब करुन सदर विविध कामाच्या अंमलबजावणीसाठी जिल्हाधिकाऱ्यांना प्राधिकृत करण्याचा निर्णय घेण्यात आला. जिल्हाधिकाऱ्याने नेमलेल्या शासकीय यंत्रणेने देखील शासकीय नियम पाळून कामाची पूर्तता करावी.

४. समितीद्वारे मजूर कामांना प्रथमत: ५०% रक्कम प्रदान केली जाते. संबंधित यंत्रणेकडून सदर रकमेच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्यानंतर उर्वरित ५०% रक्कम प्रदान करण्यात येते.

५. **सदर निधी खर्च करताना सर्व संबंधितांनी खालील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करावे.**

१) सदर निधी वितरणासाठी सह सचिव/उपसचिव तथा सचिव, कोयना भूकंप पुनर्वसन निधी समिती यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांनी सदर निधी कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग रत्नागिरी, जिल्हा परिषद रत्नागिरी तसेच कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांना BEAMS प्रणालीवर उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही करावी.

२) कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग रत्नागिरी, जिल्हा परिषद रत्नागिरी तसेच कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांनी या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तद्नुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांना सत्वर सादर करावा.

३) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात

यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

४) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी .

५) सदरच्या आदेशातील नमूद लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक राहणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित यंत्रणेचे कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

६) सदरच्या आदेशातील नमूद लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही, याची संबंधित यंत्रणेचे कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

७) सदरच्या आदेशातील नमूद लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियंत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

८) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधी संबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconciliation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

९) संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilisation Certificate) पुढील निधी मागणी प्रस्तावासोबत शासनास सादर करावे. तसेच सदर उपयोगिता प्रमाणपत्र (Utilisation Certificate) महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी यांनाही सादर करावे.

१०) या संदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०२४-२०२५ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

६. सदर आदेश वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय नियमावली भाग पहिला उपविभाग तीन परिच्छेद क्र. २७(२) अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार व वित्त विभाग अनौ. संदर्भ क्र. १३१/२०२५/व्यय-१०, दिनांक ११ मार्च, २०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०३२५१२०७१३५७१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ

Digitally signed by SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=559498df564ab1121a356349085c1b8e3cc0f12569ba0f7f209038 6d4dccb333, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F7145AF5949FB706E2DCB06C2B209B58FFA369F6E085E02 041722C90F0528791, cn=SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
Date: 2025.03.25 12:07:55 +05'30'

**(सत्यनारायण बजाज)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव.
३) मा. मंत्री (पर्यटन, खनिकर्म, माजी सैनिक कल्याण) यांचे खाजगी सचिव
४) मा. मंत्री/राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव
५) प्रधान सचिव (मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहाय्यक
६) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
७) संचालक, लेखा व कोषागरे

८) वित्तीय सल्लागार व सह सचिव, महसूल व वन विभाग(म. व पु.) मंत्रालय, मुंबई.
९) सहसचिव, कार्यासन-र/५, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०) जिल्हाधिकारी, सातारा/रत्नागिरी.
११) वित्त विभाग(अर्थसंकल्प-६/व्यय-१०, वित्त आयोग कक्ष), मंत्रालय,मुंबई-३२,
१२) कार्यासन अधिकारी (ब-१/म-७/पीएसी कायासने) मंत्रालय, मुंबई-३२,
१३) निवडनस्ती (कार्यासन-र/५)

## परिशिष्ठ-अ

संगमेश्वर तालुक्यातील सन २०२४-२५ मधील कामांना कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग रत्नागिरी, जिल्हा परिषद, रत्नागिरी तसेच कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांनी दिलेल्या तांत्रिक मान्यतेचे प्राप्त प्रस्तावास प्रशासकिय मंजूरीचा तपशील.

| अ. क्र. | कामाचे नाव ( ता. संगमेश्वर, जि. रत्नागिरी ) | तांत्रिक मान्यता दिनांक | एकूण प्रशासकिय मान्यतेची रक्कम | प्रशासकिय मान्यतेसह ५०% निधीवितरण रक्कम (पहिला हप्ता) |
|---|---|---|---|---|
| १. | मौजे देवळे बौध्दवाडी रस्ता मजबुतीकरण व डांबरीकरण करणे व गटार बाधणे. | १४/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| २. | मौजे सायले बौध्दवाडी (खालची) रस्ता मजबुतीकरण व डांबरीकरण करणे. | १४/१०/२०२४ | १५,००,०००/- | ७,५०,०००/- |
| ३. | मौजे धामापुर तर्फे संगमेश्वर सप्रेवाडी येथे निलेश बाईत घर ते गणेश माईन घर पर्यंत रस्ता कॉंक्रिटीकरण करणे. | १५/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ४. | मौजे फणसवणे मोहल्ला येथे गटार बांधणे. | १५/१०/२०२४ | ५,००,०००/- | २,५०,०००/- |
| ५. | मौजे फणसवणे लांबेवाडी गैबी घर ते नदी पर्यंत पाखाडी बांधणे. | १५/१०/२०२४ | ३,००,०००/- | १,५०,०००/- |
| ६. | मौजे साकळकोंड साठवण टाकी जवळ संरक्षक भिंत बांधणे. | १५/१०/२०२४ | १५,००,०००/- | ७,५०,०००/- |
| ७. | मौजे मुचरी गवळीवाडी सभागृह बांधणे. | १५/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ८. | मौजे कडवई ओकटेवाडी भास्कर ओकटे यांच्या घरासमोरील रस्त्याला संरक्षक भिंत बांधणे. | १५/१०/२०२४ | ५,००,०००/- | २,५०,०००/- |
| ९. | मौजे धामणी अलीकडची बौध्दवाडी येथे सार्वजनिक सभागृह बांधणे. | १५/१०/२०२४ | १५,००,०००/- | ७,५०,०००/- |
| १०. | मौजे तामनाळे रामेश्वर मंदिर येथे संरक्षक भिंत बांधणे. | १५/१०/२०२४ | ७,००,०००/- | ३,५०,०००/- |
| ११. | मौजे काटवली ढोसळवाडी स्मशानभूमीकडे जाणारा रस्ता तयार करणे व संरक्षक भिंत बांधणे. | १५/१०/२०२४ | १५,००,०००/- | ७,५०,०००/- |
| १२. | मौजे आंगवली पिंपरी पुल ते खडकवाडी रस्ता खडीकरण डांबरीकरण करणे. | १५/१०/२०२४ | ५,००,०००/- | २,५०,०००/- |
| १३. | मौजे वाशी तर्फे देवरुख मुख्य रस्ता ते भिकाजी करंडे यांच्या घराकडे जाणारा रस्ता खडीकरण डांबरीकरण करणे. | १५/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| १४. | नौजे धामणी सुतारवाडी येथे सामाजिक सभागृह बांधणे. | १५/१०/२०२४ | १५,००,०००/- | ७,५०,०००/- |
| १५. | मौजे बामणोली सार्वजनिक विहीर ते तुकाराम सिताराम गुरव घर येथे बंदिस्त गटार बांधणे. | १५/१०/२०२४ | ६,००,०००/- | ३,००,०००/- |
| १६. | मौजे आंगवली जाधववाडी रस्ता डांबरीकरण करणे. | १५/१०/२०२४ | ७,००,०००/- | ३,५०,०००/- |
| १७. | मौजे कळंबस्ते मलदेवाडी (रामवाडी) येथे सामाजिक सभागृह बांधणे. | १५/१०/२०२४ | १८,००,०००/- | ९,००,०००/- |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १८. | मौजे कडवई ओटकेवाडी मारुती ओकटे, सिताराम ओकटे यांच्या घरालगत ओढ्याला संरक्षक भिंत बांधणे. | १५/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| १९. | मौजे निवे खुर्द सावंतवाडी अंतर्गत पाखाडी बांधणे. | २८/११/२०२४ | ५,००,०००/- | २,५०,०००/- |
| २०. | मौजे पाटगाव नटेवाडी दशरथ नटे घर ते सुर्यकांत नटे घर रस्ता खडीकरण व डांबरीकरण करणे. | २८/११/२०२४ | ५,००,०००/- | २,५०,०००/- |
| २१. | मौजे आंबवली मराठवाडी मधलीवाडी येथे विजय दत्ताराम बने यांच्या घराजवळ संरक्षक भिंत बांधणे. | ३०/०१/२०२५ | ६,००,०००/- | ३,००,०००/- |
| २२. | मौजे बुरंबाड वरची किंजळकरवाडी (वरचा वठार) सामाजिक सभागृह बांधणे. | ३०/०१/२०२५ | १२,००,०००/- | ६,००,०००/- |
| २३. | मौजे श्रृंगारपूर भैरीभवानी मंदिर येथे सभामंडप बांधणे. | २५/०९/२०२४ | १५,००,०००/- | ७,५०,०००/- |
| २४. | मौजे आंबवली फणसट महिला ग्रामसंघाचा ऑफिससाठी कार्यालय बांधणे. | १५/०१/२०२५ | १५,००,०००/- | ७,५०,०००/- |
| २५. | मौजे नायरी कब्रस्थान येथे स्वच्छतागृह बांधणे. | १५/०१/२०२५ | ५,००,०००/- | २,५०,०००/- |
| २६. | मौजे कळंबस्ते मोहल्ला मस्जिद ते दर्ग्याकडे जाणारा रस्ता मजबुतीकरण, डांबरीकरण करणे. | १५/०१/२०२५ | ८,००,०००/- | ४,००,०००/- |
| २७. | मौजे साडवली साईनगर साजन गल्ली ते चव्हाण घर रस्ता तयार करणे. | १५/०१/२०२५ | ६,००,०००/- | ३,००,०००/- |
| २८. | मौजे सरंद बौद्धवाडी येथे सभागृह बांधणे. | ०४/०२/२०२५ | १५,००,०००/- | ७,५०,०००/- |
| २९. | मौजे बोरसुत सोनारवाडी येथे सभामंडप बांधणे. | ०४/०२/२०२५ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ३०. | मौजे तेऱ्हे टाकेवाडी येथे सामाजिक सभागृह विस्तारीकरण करणे | ०४/०२/२०२५ | १५,००,०००/- | ७,५०,०००/- |
| ३१. | मौजे धामापूर तर्फे संगमेश्वर गोवळवाडी येथे सार्वजनिक सभागृह बांधणे. | ०४/०२/२०२५ | १७,००,०००/- | ८,५०,०००/- |
| ३२. | मौजे धामापूर तर्फे संगमेश्वर बोलेवाडी येथे सार्वजनिक सभागृह बांधणे. | ०४/०२/२०२५ | १७,००,०००/- | ८,५०,०००/- |
| ३३. | मौजे सरंद खालची वाडी गणपती विसर्जन घाट बांधणे. | ०४/०२/२०२५ | ७,००,०००/- | ३,५०,०००/- |
| ३४. | मौजे देवरुख पर्शुरामवाडी येथे सभामंडप बांधणे. | ०६/०२/२०२५ | १५,००,०००/- | ७,५०,०००/- |
| ३५. | मौजे धामापूर तर्फे संगमेश्वर भडवळेवाडी येथे सार्वजनिक सभागृह बांधणे. | ०७/०२/२०२५ | १७,००,०००/- | ८,५०,०००/- |
| ३६. | मौजे कोसुंब जुगाई मंदिर ते गुरववाडी रस्त्याला संरक्षक भिंत बांधणे. | ०९/१०/२०२४ | ३५,००,०००/- | १७,५०,०००/- |
| ३७. | मौजे दख्खण धनगर वाडी सार्वजनिक विहिरीला सरंक्षक भिंत बांधणे. | ०९/१०/२०२४ | ७,००,०००/- | ३,५०,०००/- |
| ३८. | मौजे दखन धनगर वाडी येथे सरंक्षक भिंत बांधणे. | ०९/१०/२०२४ | ७,००,०००/- | ३,५०,०००/- |
| ३९. | आबेडखुर्द कुणबी भवन सामाजिक सभागृह विस्तारीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | ५०,००,०००/- | २५,००,०००/- |
| ४०. | मौजे गोळवली विजलेवाडी सभाग्रह बांधणे. टप्पा-२ | १०/१०/२०२४ | ७,००,०००/- | ३,५०,०००/- |
| ४१. | मौजे कासारकोळवण उगवती वाडी येथे गुरवांचे घर ते राजाराम करंबेळे घरापर्यंत अंतर्गत पाखाडी बांधणे. | १०/१०/२०२४ | ७,००,०००/- | ३,५०,०००/- |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ४२. | मौजे हरपुडे गुरववाडी अंतर्गत पाखाडी बांधणे. | १०/१०/२०२४ | ५,००,०००/- | २,५०,०००/- |
| ४३. | मौजे हरपुडे मराठवाडी रस्ता मजबुतीकरण व डांबरीकरण करणे. | १०/१०/२०२४ | ८,००,०००/- | ४,००,०००/- |
| ४४. | कुंडी आत्माराम सीतारात सांवत घराशेजारी सरंक्षक भिंत बांधणे. | १०/१०/२०२४ | ५,००,०००/- | २,५०,०००/- |
| ४५. | मौजे निवधे गुरववाडी येथे सभाग्रह बांधणे. | १०/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ४६. | मठ धामापूर येथे आरसीसी तळी बांधणे. | ०९/०२/२०२५ | १४,९९,९१४/- | ७,४९,९५७/- |
| ४७. | कडवई वरची कुंभारवाडी येथे विहीर दुरुस्ती करणे. | ०९/०२/२०२५ | ९,९९,६०६/- | ४,९९,८०३/- |
| ४८. | सायले माईनवाडी येथे विहीर बांधणे. | ०९/०२/२०२५ | ११,९९,८९४/- | ५,९९,९४७/- |
| ४९. | आरवली सपाट भुवडवाडी येथे विहीर बांधणे. | ०९/०२/२०२५ | ११,९९,८९४/- | ५,९९,९४७/- |
| ५०. | आरवली मधली भुवडवाडी येथे विहीर बांधणे. | ०९/०२/२०२५ | ९,९९,६०३/- | ४,९९,८०२/- |
| ५१. | काटवली ढोसळवाडी येथे विहिरीला सरंक्षक भिंत बांधणे. | ०९/०२/२०२५ | ९,९९,९०१/- | ४,९९,९५१/- |
| ५२. | कसबा दख्खीन मोहल्ला येथे पाईपलाईन करणे. | ०९/०२/२०२५ | ५,९९,८४७/- | २,९९,९२४/- |
| ५३. | मौजे कोसुंब रामवाडी येथे सामाजिक सभाग्रह बांधणे. | १५/१०/२०२४ | २०,००,०००/- | १०,००,०००/- |
| ५४. | मौजे चिखली साळुंखेवाडी रस्ता मजबुतीकरण डांबरीकरण करणे. | १५/१०/२०२४ | ७,००,०००/- | ३,५०,०००/- |
| ५५. | मौजे शिंदे आंबेरी आलीमवाडी राउतवाडी गणपती विसर्जन घाटाकडे जाणारी पाखाडी बांधणे. | १५/१०/२०२४ | ५,००,०००/- | २,५०,०००/- |
| ५६. | मौजे कडवई मोहल्ला विकासनगर येथे रस्त्यालगत सरंक्षक भिंत बांधणे. | १५/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ५७. | मौजे तुरळ येथे चिखली दहागाव दीक्षाभूमी येथे संरक्षक भिंत बांधणे. | १५/१०/२०२४ | २०,००,०००/- | १०,००,०००/- |
| ५८. | मौजे कडवई बौद्धवाडी रस्ता मजबुतीकरण व डांबरीकरण करणे. | १५/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ५९. | मौजे कळंबस्ते वाडा वेसराड भंडारवाडी घाट बांधणे. | १५/१०/२०२४ | ५,००,०००/- | २,५०,०००/- |
| ६०. | मौजे कळंबस्ते वाडा वेसराड रस्ता मजबुतीकरण डांबरीकरण करणे व गटार बांधणे. | १५/१०/२०२४ | १५,००,०००/- | ७,५०,०००/- |
| ६१. | मौजे पेढांबे सीमेचा पऱ्या येथे संरक्षक भिंत बांधणे. | १५/१०/२०२४ | ८,००,०००/- | ४,००,०००/- |
| ६२. | मौजे काटवली पड्याळवाडी अंर्तगत पाखाडी बांधणे. | १५/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ६३. | मौजे अंत्रवली सुर्वे वाडी अंर्तगत पाखाडी बांधणे. | १५/१०/२०२४ | ७,००,०००/- | ३,५०,०००/- |
| ६४. | मौजे कडवई कुंभारवाडी ते यादववाडी पाखाडी तयार करणे. | १५/१०/२०२४ | ४,००,०००/- | २,००,०००/- |
| ६५. | मौजे फणसवणे विचारेवाडी भैरी मंदिर येथे संरक्षक भिंत बांधणे. | १५/१०/२०२४ | ८,००,०००/- | ४,००,०००/- |
| ६६. | मौजे करजुवे वाकसाळवाडी ते ब्राह्मणवाडी रस्ता मजबुतीकरण व डांबरीकरण करणे. | १५/१०/२०२४ | ७,००,०००/- | ३,५०,०००/- |
| ६७. | मौजे कळंबूशी मुख्य रस्ता साईमंदिर ते कशेड रस्ता मजबुतीकरण व डांबरीकरण करणे. | १५/१०/२०२४ | ८,००,०००/- | ४,००,०००/- |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ६८. | मौजे आरवली ग्रामपंचायत बाजार गाळे दुरुस्ती करणे. | १५/१०/२०२४ | १५,००,०००/- | ७,५०,०००/- |
| ६९. | मौजे साडवली नेदरवाडी येथे पिकअप शेड बांधणे. | ०७/०१/२०२५ | ३,००,०००/- | १,५०,०००/- |
| ७०. | मौजे करंबेळे मिरगळवाडी सामाजिक सभाग्रह बांधणे. | ०७/०१/२०२५ | १५,००,०००/- | ७,५०,०००/- |
| ७१. | मौजे गुरववाडी ग्रामपंचायत कार्यालय येथे शेड मारणे. | ०७/०१/२०२५ | ७,००,०००/- | ३,५०,०००/- |
| ७२. | मौजे राजवाडी मांजरेकरवाडी रस्ता खडीकरण व डांबरीकरण करणे. | ०८/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ७३. | मौजे फणसवणे श्री. आसिफ महमद धामस्कर यांच्या घराच्या मागील बाजूस संरक्षक भिंत बांधणे. | ११/०२/२०२५ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ७४. | मौजे घोडवली, गुरववाडी, सम्राटवाडी रस्ता मजबुतीकरण व डांबरीकरण करणे. | ११/०२/२०२५ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ७५. | मौजे कुभारखाणी खुर्द बौध्दवाडी येथे विहार लगत पाखाडीला संरक्षण भिंत बांधणे. | ११/०२/२०२५ | ७,००,०००/- | ३,५०,०००/- |
| ७६. | मौजे कंळबूशी शेवट करंडा येथे स्मशानशेड बांधणे व सुशोभिकरण करणे. | ०४/०३/२०२५ | ८,००,०००/- | ४,००,०००/- |
| ७७. | पाटगांव कुंभारवाडी गणेश मंदिर येथे पेव्हर ब्लॉक बसविणे. | ०७/०३/२०२५ | ३,००,०००/- | १,५०,०००/- |
| ७८. | मौजे विघ्रवली ग्रामदेवता मंदिर रस्ता मजबुतीकरण व डांबरीकरण करणे. | २१/०२/२०२५ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ७९. | मौजे धामापूर तर्फे संगमेश्वर पड्येवाडी येथे सार्वजनिक सभागृह बांधणे. | २१/०२/२०२५ | १२,००,०००/- | ६,००,०००/- |
| ८०. | मौजे साडवली कासारवाडी येथे सामाजिक सभागृह बांधणे. | ०७/०३/२०२५ | २५,००,०००/- | १२,५०,०००/- |
| ८१. | मौजे नायरी मस्जिद ते जमीर पाटणकर यांच्या घरापर्यंत गटार बांधणे. | ०७/०३/२०२५ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ८२. | मौजे पुर्ये तर्फे सावर्डा जांभेवाडी येथे आरसीसी टाकी बांधणे. | ०७/०३/२०२५ | ६,९९,९०४/- | ३,४९,९५२/- |
| ८३. | मौजे धामणी बडदवाडी येथे सभागृह बांधणे. | २५/०९/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ८४. | मौजे गोळवली विजलेवाडी सभागृहाजवळ रस्त्याला संरक्षण भिंत बांधणे | २५/०९/२०२४ | ७,००,०००/- | ३,५०,०००/- |
| | | **एकूण** | **८,९९,९८,५६३/-** | **४,४९,९९,२८३/-** |

SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ

Digitally signed by SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=559498df564ab1121a356349085c1b8e3cc0f12569ba0f7f2090386d4dccb333, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F7145AF5949FB706E2DCB06C2B209B58FFA369F6E085E02041722C90F0528791, cn=SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
Date: 2025.03.25 12:08:17 +05'30'

**( सत्यनारायण बजाज )**
उपसचिव तथा न्यासाचे सचिव,
कोयना भूकंप पुनर्वसन निधी समिती.